**सह संचालक, नगर रचना (गट-अ) पदावरील पदोन्नती पुढे सुरु ठेवण्याबाबत (तांत्रिक खंड)...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२१२/प्र.क्र.१०१-ब/नवि-२७,**
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ मे, २०१५.

वाचा :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१०१०/३३३/प्र.क्र.११२/नवि-२७, दि.२९.१२.२०१२.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२१२/प्र.क्र.१०१-ब/नवि-२७, दि.०१ मार्च, २०१४.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०८७/२००/प्र.क्र.३/८७/बारा, दि.०८.१०.१९९०.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील "उप संचालक, नगर रचना" पदावरुन "सह संचालक, नगर रचना" पदावर पदोन्नती देण्यासाठी अर्हताकारी सेवेची अट शिथील करण्याबाबत अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२.०७.२०१३ रोजी बैठक घेण्यात आली होती. या बैठकीतील निर्णयानुसार नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील मंजूर ८ सह संचालक, नगर रचना पदांपैकी २ रिक्त पदांवर पदोन्नती देण्याकरिता उप संचालक, नगर रचना या पदावर ३ वर्षे सेवा पूर्ण झालेले मागासवर्गीय उमेदवार उपलब्ध नसल्याने समितीने श्री. नि. सी. अढारी (अ.ज.) व श्री. ह. ज. नाझीरकर (भ.ज.-क) यांना उप संचालक, नगर रचना पदावरील अर्हताकारी ०३ वर्षाच्या सेवेची अट शिथील करुन निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता तदर्थ पदोन्नती व ११ महिन्याच्या कालावधीनंतर १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन त्यांची पदोन्नती पुढे चालू ठेवण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार श्री. नि. सी. अढारी, उप संचालक, नगर रचना (अ.ज.) व श्री. ह. ज. नाझीरकर, उप संचालक, नगर रचना (भ.ज.-क) यांना नगर विकास विभागांच्या संदर्भ-२ येथील दि.०१.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता सह संचालक, नगर रचना (वेतनसंरचना पीबी-४, रु.३७,४००-६७,०००+ग्रेड पे रु.८,७००) पदावर आदेशाच्या दिनांकापासून तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली होती. श्री. नि. सी. अढारी, सह संचालक, नगर रचना (अ.ज.) व श्री. ह. ज. नाझीरकर, सह संचालक, नगर रचना (भ.ज.-क) यांचा तदर्थ पदोन्नतीचा ११ महिन्याचा कालावधी दि.३१.०१.२०१५ रोजी संपुष्टात आला आहे.

०२. सबब, श्री. नि. सी. अढारी, उप संचालक, नगर रचना (अ.ज.) व श्री. ह. ज. नाझीरकर, उप संचालक, नगर रचना (भ.ज.-क) यांना तदर्थ पदोन्नतीमध्ये ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन त्यांची सह संचालक, नगर रचना पदावरील तदर्थ पदोन्नती पुढे सुरु ठेवण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. नि. सी. अढारी, उप संचालक, नगर रचना (अ.ज.) व श्री. ह. ज. नाझीरकर, उप संचालक, नगर रचना (भ.ज.-क) यांना खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार १ दिवसांचा तांत्रिक खंड देऊन त्यांना "सह संचालक, नगर रचना" (वेतनसंरचना पीबी-४, रु.३७,४००-

६७,०००+ग्रेड पे रु.८,७००) पदावर स्तंभ ६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या कालावधीकरिता तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **अधिकाऱ्याचे नांव** | **सह संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नतीचा दिनांक** | **सह संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नती संपुष्टात आल्याचा दिनांक** | **तांत्रिक खंडाचा दिनांक** | **सह संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नती पुढे सुरु ठेवण्यात येत असलेला कालावधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. नि. सी. अढारी (अ.ज.), उप संचालक, नगर रचना. | ०१.०३.२०१४ | ३१.०१.२०१५ | ०१.०२.२०१५ | दि.०२.०२.२०१५ ते दि.०१.१२.२०१५ |
| २ | श्री. ह. ज. नाझीरकर (भ.ज.-क), उप संचालक, नगर रचना. | ०१.०३.२०१४ | ३१.०१.२०१५ | ०१.०२.२०१५ | दि.०२.०२.२०१५ ते दि.०१.१२.२०१५ |

**०२.** वरील उप संचालक, नगर रचना यांना सह संचालक, नगर रचना पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती खालील शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**अ.** सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात राहील व ती वरिष्ठ संवर्गात ज्येष्ठतेसाठी ग्राह्य धरता येणार नाही. तसेच त्या संवर्गात वेतनाव्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ मिळणार नाहीत.

**ब.** अशी पदोन्नती केवळ ११ महिन्यांसाठी देण्यात देण्यात येत आहे त्यानंतर त्यांना एक दिवसांचा तांत्रिक खंड देऊन त्यांची पदोन्नती पुढे चालू ठेवण्यात येईल.

**क.** या ११ महिन्यांच्या कालावधीत / वाढीव कालावधीत कनिष्ठ श्रेणीत ०३ वर्षे सेवा पूर्ण झाल्यावर त्यांची नियमित पदोन्नतीसाठी पात्रता पुन्हा अजमाविण्यात येईल.

**०३.** सदरहू अधिकाऱ्यांची तदर्थ पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल असलेल्या मूळ याचिका क्र.८४५२/२००४ वरील न्यायनिर्णयाच्या आणि त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षाच्या पुढे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवा कालावधीपुढे सेवेत राहण्यास पात्रापात्रता अजमाविण्याच्या निर्णयाच्या अधीन राहील.

**०४.** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.वेतन-१०८५/सीआर-७९९/८५/सेवा, दि.०५ डिसेंबर, १९८५ व वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.वेतन-१०८६/सीआर-१५१/सेवा-३, दि.२४ फेब्रुवारी, १९८६ मधील तरतूदीनुसार तदर्थ पदोन्नतीस वेतननिश्चितीकरिता विकल्पाची तरतूद नसल्याने या आदेशान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) नुसार / महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १३ नुसार करण्यात यावी.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१५०५१८१७०९३६९५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: CN = Siddharam Karbasayya Salimath, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.05.18 17:11:22 +05'30'

**(एस. के. सालीमठ)**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.**

**प्रत :-**

१. श्री. नि. सी. अढारी, सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर.

२. श्री. ह. ज. नाझीरकर, सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.

संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(३-प्रती)**
५. सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर.
६. सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / अमरावती.
८. निवडनस्ती / (नवि-२७).

*****